**महा ई-सेवा केंद्रांमार्फत भूमि अभिलेखांचे अद्ययावतीकरण**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
माहिती तंत्रज्ञान संचालनालय,
परिपत्रक क्रमांक: मातंसं/नस्ती०८/प्रक्र ११०/३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २३ जून २००९

## परिपत्रक:

मा. मुख्यमंत्री यांनी दि. ७ जून २००९ रोजी नांदेड येथे महा ई-सेवा केंद्राच्या उद्घाटन प्रसंगी राज्यातील जनतेस महा ई-सेवा केंद्रांमार्फत ७/१२ चे दाखले उपलब्ध करुन देण्यात येतील अशी घोषणा केली आहे.

२. सध्या भुमि अभिलेखाच्या संगणकीकरणाच्या कार्यक्रमा अंतर्गत राज्यातील सर्व तहसिलांमध्ये ७/१२ मधील हक्कांच्या नोंदी अद्ययावत केल्यानंतर या अद्ययावत नोंदीची सीडी दर पंधरवडयाने जिल्हा कार्यालयाकडे पाठविण्यात येते. तद्नंतर सर्व तहसिलांमध्ये सीडी वरील डेटा बेसेसचे एका स्वतंत्र सीडीवर कॉपी करुन ही सीडी जिल्हा कार्यालयाकडुन राज्य पातळीवर राज्य सूचना विज्ञान केंद्रात ठेवण्यात आलेल्या संगणक प्रणालीमधील डेटा बेस चे अद्ययावतीकरण करण्यासाठी पाठविण्यात येते. तद्नंतर या अद्ययावत माहितीच्या आधारावर http://mahabhulekh.mumbai.nic.in या वेबसाईटच्या माध्यमातुन ७/१२ ची माहिती जनतेस उपलब्ध करुन देण्यात येते.

३. राज्य पातळीवरील डेटाबेस मधील माहिती नियमितपणे परिपुर्णतेने अद्ययावत होत नसल्याचे निदर्शनास आले आहे. हा डेटा बेस अद्ययावत असणे व ही माहिती वेबसाईटच्या माध्यमातुन जनतेस तसेच शासनाच्या विविध कार्यालयांना तत्परतेने उपलब्ध व्हावी यासाठी पुढील प्रमाणे माहितीचे अद्ययावतीकरण करण्यात यावे.

४. शासनाने नागरी सुविधा पुरविण्यासाठी (साधारणत: चार गावांना मिळुन एक महा ई-सेवा केंद्र सुरु करण्यासाठी ) महसुली विभाग निहाय पुढील प्रमाणे चार सुविधा केंद्र एजन्सींची (Service Center Agency (SCA)) नेमणुक केली आहे.

| महसुली विभाग | Service Center Agency (SCA) |
|---|---|
| नाशिक | 3i infotech Ltd. |
| औरंगाबाद व अमरावती | CMS Computers Ltd. |
| नागपुर | Reliance Commumications Ltd. |
| कोकण व पुणे | Spanco Ltd |

या SCA चे जिल्हा समन्वयक त्या जिल्हयातील जिल्हा कार्यालयातील महसुली तज्ञ तसेच तहसिल कार्यालयांकडे नियमितपणे समन्वय साधुन व पाठपुरावा करुन या माहितीची संकलीत सीडी जिल्हा सूचना विज्ञान अधिकाऱ्याकडे राज्य मुख्यालयाकडे पाठविण्यासाठी सुपूर्द करतील. जिल्हा सूचना विज्ञान अधिकारी यांचे तांत्रिक मदतीने अद्ययावत माहितीची सीडी, अधीक्षक, भूमि अभिलेख यांचे स्वाक्षरीने राज्य सूचना विज्ञान केंद्राकडे पाठविली जाईल याची खात्री करतील व तसे जिल्हाधिकारी यांना लेखी स्वरुपात कळबितील. याबाबत काही अडचणी उद्‌भवल्यास जिल्हाधिकारी यांचे निदर्शनास आणुन देतील आणि जिल्हाधिकारी याबाबतीत आवश्यक तो समन्वय साधतील.

हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २००९०६२३१५५४५३००१ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(प्र. दि. सोहळे)**
**संचालक (मातं) तथा उप सचिव**

**प्रत सादर,**

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,

**प्रत माहिती व आवश्यकत्या कार्यवाहीसाठी रवाना**

सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा सूचना विज्ञान अधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
मे. PWC (प्रकल्प सल्लागार)
राज्य सूचना विज्ञान अधिकारी, मुंबई
निवड नस्ती (२ प्रती).

*****